पदोन्नतीच्या वेळी वेतननिश्चिती करता विकल्प देणेबाबत.

---

महाराष्ट्र शासन
वित्त विभाग
परिपत्रक क्रमांक वेतन-1095/सीआर-83/95/सेवा-3,
मंत्रालय, मुंबई 400 032, दिनांक 19 डिसेंबर 1995.

पहा :- (1) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. पीएवाय-1092/सीआर-1100(एक)/एसईआर-3, दिनांक 6 नोव्हेंबर 1984.

(2) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक पीएवाय-1092/सीआर-1100(दोन), दिनांक 6 नोव्हेंबर 1984.

(3) शासन निर्णय, क्रमांक वेतन-1085/सीआर-909/सेवा-3, दिनांक 15 ऑक्टोबर 1985.

(4) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक वेपूर-1289/42/सेवा-10, दिनांक 29 मे 1989.

(5) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक वेपूर-1289/99/सेवा-10, दिनांक 6 जुलै 1939.

## प रि प त्र क

वरील क्रमांक (1) व (2) येथील वित्त विभागाच्या दिनांक 6 नोव्हेंबर 1984 च्या शासन निर्णयांमधील तरतुदीअन्वये पदोन्नतीनंतर वेतनांची निश्चिती महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, 1981 मधील नियम 11(1)(ए) खाली अथवा खालच्या पदावर वेतनवाढ देय झाल्यानंतर करून घेण्यासंबंधीचा विकल्प शासकीय कर्मचा-यांना देता येतो. या आदेशान्वये 1 मे 1981 किंवा त्यानंतर म्हणजे दिनांक 6 नोव्हेंबर 1984 पर्यन्त पदोन्नत झालेल्या शासकीय कर्मचा-यांना जरूर तो विकल्प देण्यासाठी 3 महिन्यांचा कालावधी देण्यात आला होता. दिनांक 6 नोव्हेंबर 1984 नंतर पदोन्नत होणा-या कर्मचा-यांना त्यांच्या पदोन्नतीच्या दिनांकापासून एक महिन्याच्या कालावधीच्या आत आता असा विकल्प द्यावयाचा आहे. शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक 15 ऑक्टोबर 1985 च्या परिच्छेद 3 मध्ये, कर्मचा-यांच्या पदोन्नतीचे आदेश काढताना त्या आदेशातच संबंधित कर्मचा-याने वेतननिश्चिती संबंधीचा आपला विकल्प पदोन्नतीच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत द्यावा व अशा प्रकारचा विकल्प न दिल्यास, वेतन-निश्चिती सरळ, महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, 1981 मधील नियम 11 (1)(ए) खाली केली जाईल असा आणखी एक परिच्छेद न चुकता अंतर्भूत करण्यात यावा असे निदेश देण्यात आलेले आहेत.

शासनाच्या असे निदर्शनास आले आहे की, अद्यापही संबंधित कर्मचा-याच्या पदोन्नतीच्या आदेशामध्ये वेतन-निश्चिती करण्यासंबंधीचा विकल्प देण्यासंबंधीचा वर विहित केलेला परिच्छेद अंतर्भूत केला जात नाही. यास्तव सर्व प्रशासकीय विभाग व त्यांच्या अधिपत्याखालील विभाग प्रमुख यांना या परिपत्रकाद्वारे पुन:सूचित करण्यात येते की, त्यांनी संबंधित कर्मचा-यांना पदोन्नतीच्या आदेशात वरीलप्रमाणे विकल्प देण्याविषयीचा परिच्छेद न चुकता अंतर्भूत करण्याची दक्षता घ्यावी. या आदेशाची अंमलबजावणी न झाल्यास व संबंधित कर्मचा-यांनी असा विकल्प उशिरा सादर करण्याबाबत मागणी केल्यास त्यास मंजुरी दिली जाणार नाही याची सर्व संबंधितांनी नोंद घ्यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ल. पां. कालिबाग,
शासनाचे अवर सचिव, वित्त विभाग.

(कृ.मा.प.)

शा.म.मु.रोटा/वि.वि./पु-1314(6000+40-1-96)

प्रति,

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-1, मुंबई,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-2, नागपूर,
महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-1, मुंबई,
महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-2, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा अधिकारी, मुंबई,
राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे सचिव,
उप मुख्यमंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री आणि राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व विभागीय आयुक्त,
मंत्रालयाच्या सर्व विभागांखालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
* प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
* प्रबंधक, लोकायुक्त व उप लोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
वित्त विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती, वित्त विभाग, सेवा-3.

1996 चा क्रमांक

---

* पत्राद्वारे.